# महाराष्ट्र शासन

ई-मेल-doe१०.rfd@maharashtra.gov.in
दुरध्वनी क्रमांक (०२२) २२७९३७५४

क्र. बदली-२०१७/प्र.क्र.२५७/ई-१०
महसूल व वन विभाग, मंत्रालय,
मुख्य इमारत, १ ला मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २६ ऑक्टोबर, २०१८.

प्रति,

**जिल्हाधिकारी,**
**नाशिक / अमरावती / अहमदनगर / सातारा / लातूर / सांगली / पुणे / परभणी / जालना / सोलापूर / कोल्हापूर / पालघर / ठाणे / वाशिम**

**विषय :- महसूल विभागातील क्षेत्रिय कार्यालयातील गट-क, तलाठी संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या विनंतीवरुन आंतर विभागीय बदली / आंतर जिल्हा बदलीबाबत.**

महोदय,

वरील विषयाबाबत संबंधित सर्व जिल्हाधिकारी यांच्याकडून प्राप्त झालेल्या अहवालाच्या अनुषंगाने महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ व शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, दिनांक ०३.०६.२०११ मधील तरतूदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने खालील **विवरणपत्र-अ** येथे नमूद तलाठी तसेच सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने विशेष प्रकरणी अपवादात्मक परिस्थितीत ५ वर्षे सेवा कालावधीची अट शिथिल करुन खालील **विवरणपत्र-ब** येथे नमूद तलाठी कर्मचाऱ्यांच्या त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या जिल्ह्यांत बदली करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

<u>विवरणपत्र-अ</u>

| अ.क्र. | कर्मचाऱ्यांचे नांव, पदनाम | कोठून | कोठे |
|---|---|---|---|
| १ | श्री शिवाजी प्रशांत मते तलाठी | नाशिक | अमरावती |
| २ | श्री सुनिल मधुकर पाटील तलाठी | अहमदनगर | सातारा |
| ३ | श्री.कमलाकर निवृत्ती आरडले, तलाठी | अहमदनगर | लातूर |
| ४ | श्री.नितीन बापु शिरसाठ, तलाठी | अहमदनगर | नाशिक |
| ५ | श्री विकास जगन्नाथ सुर्यवंशी, तलाठी | नाशिक | सांगली |
| ६ | श्री भारत लक्ष्मण वाघमोडे, तलाठी | नाशिक | सांगली |
| ७ | श्रीमती रश्मी अंबादास गालपेल्ली, तलाठी. | नाशिक | पुणे |
| ८ | अ) श्री.विजय विष्णु जाधव, तलाठी. | परभणी | जालना |
| | ब) श्री. भगवान संभाजीराव गव्हाणे, तलाठी. | जालना | परभणी |

**विवरणपत्र-ब**

| अ.क्र. | कर्मचाऱ्यांचे नांव, पदनाम | कोठून | कोठे |
|---|---|---|---|
| १ | **श्री.शरद विठ्ठल कांबळे, तलाठी.** | **नाशिक** | **सोलापूर** |
| २ | **श्री शिवराज वसंतराव देसाई, तलाठी** | **नाशिक** | **कोल्हापूर** |
| ३ | **श्री. विशाल आनंद साळवे, तलाठी.** | **पालघर** | **ठाणे** |
| ४ आपसी बदली | **अ) श्री.प्रकाश लक्ष्मणराव शिवरकर, तलाठी.** | **परभणी** | **वाशिम** |
| | **ब) श्रीमती मोहिनी येल्लया चिट्टमपेल्ली, तलाठी.** | **वाशिम** | **परभणी** |

**२.** तरी प्रस्तुत प्रकरणी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०१०/ प्र.क्र.२१०/ १०/ १२, दि.०३.०६.२०११ मधील खालील तरतुदींची पुन्हा खातरजमा करुन पुढील आवश्यक ती कार्यवाही करण्यात यावी व केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा, ही विनंती :-

१) विनंतीवरून, संवर्गबाह्य बदली केवळ त्याच पदावर अथवा समकक्ष पदावर करता येईल. अपवादात्मक परिस्थितीत कनिष्ठ (वेतनश्रेणी) वेतनबँड व ग्रेड पे मधील पदावर बदली करता येईल. मात्र, ज्या पदांकरीता विशिष्ट तांत्रिक वा अन्य अर्हता विहित केली असेल व स्वतंत्र निवड प्रक्रिया अवलंबण्यात येत असेल अशा संवर्गबाह्य पदावर बदली अनुज्ञेय होणार नाही.

२) संबंधित कर्मचाऱ्यांची नियुक्ती नियमित असावी व त्याला / तिला स्थायित्व प्रमाणपत्र देण्यात आले असावे.

३) संबंधित कर्मचाऱ्याची किमान ५ वर्षे सेवा पूर्ण झालेली असावी. अपवादात्मक परिस्थितीत हा कालावधी २ वर्षे इतका शिथिल करता येईल म्हणजेच किमान ३ वर्षे सेवा पूर्ण झाली असल्यास अपावादात्मक परिस्थितीत विनंती विचारात घेता येईल.

४) विनंतीवरून, संवर्गबाह्य बदली जिल्हास्तरावर बदलीपात्र पदधाराकांच्या बाबतीत केवळ अन्य जिल्ह्यातील संबंधित विभागप्रमुखांच्या अधिपत्याखालील कार्यालयात अथवा अन्य विभागप्रमुखांच्या अधिपत्याखालील कार्यालयात करता येईल आणि महसूली विभागस्तरावर बदलीपात्र पदधारकांच्या बाबतीत अन्य महसूली विभागातील संबंधित विभागप्रमुखांच्या अधिपत्याखालील कार्यालयात अथवा अन्य विभागप्रमुखांच्या अधिपत्याखालील कार्यालयात करता येईल.

५) प्रशासनाचे हित, सार्वजनिक सेवेचे हित विचारात घेऊन बदली करता येईल. संबंधित कर्मचारी ज्या कार्यालयात कार्यरत असेल त्या कार्यालयाच्या विभागप्रमुखांनी तसेच ज्या कार्यालयात बदलीबाबत विनंती केली आहे त्या विभागप्रमुखांनी बदलीसंदर्भात ना-हरकत प्रमाणपत्र देणे आवश्यक राहील.

६) ज्या पदावर बदलीबाबत विनंती केली आहे ते पद निर्बांध रिक्त असणे आवश्यक राहील. तसेच संबंधित कर्मचाऱ्यांने समान पदावर बदलीबाबत विनंती केली असल्यास त्याची ज्या मार्गाने (उदा. पदोन्नती, नामनिर्देशन) नियुक्ती झाली आहे त्या कोट्यातील पद उपलब्ध असणे आवश्यक राहील. मात्र कर्मचाऱ्यांने अन्य समकक्ष अथवा निम्न पदावर बदलीबाबत विनंती केली असल्यास सरळसेवा कोट्यातील पद उपलब्ध असणे आवश्यक राहील. तसेच संबंधित कर्मचारी ज्या प्रवर्गातील आहे (उदा. खुला प्रवर्ग, अ.जा.,इ.) त्या प्रवर्गाचे पद उपलब्ध असणे आवश्यक राहील.

७) ज्या पदावर बदलीबाबत विनंती केली आहे त्या पदावर सेवाप्रवेश नियमातील तरतुदी तसेच त्या पदास विहित केलेल्या परीक्षा व अन्य बाबींची पूर्तता करणे आवश्यक राहील.
८) संबंधित कर्मचाऱ्याची बदलीनंतर त्या पदावरील ज्येष्ठता रुजू झालेल्या दिनांकास निश्चित होईल. तसेच पुर्वीच्या सेवेचा लाभ वेतननिश्चिती, रजा, निवृत्तीवेतन याकरीता वित्त विभागाच्या संबंधित नियमातील तरतुदीनुसार अनुज्ञेय होईल.
९) या बदलीच्या अनुषंगाने, पदग्रहण अवधी, बदली अनुदान, प्रवास भत्ता व तद्नुषंगिक लाभ अनुज्ञेय होणार नाहीत.
१०) लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील पदावर बदलीसंदर्भात लोकसेवा आयोगाची मान्यता आवश्यक राहील.
११) वरीलप्रमाणे विहित केलेल्या सर्व अटी मान्य असल्याचे संबंधित कर्मचाऱ्यांकडून लेखी स्वरूपात (बंधपत्र) घेणे आवश्यक राहील.

**३.** संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी बदलीमान्य कर्मचाऱ्यांची उपरोक्त अटी व शर्ती मान्य असल्याचे बंधपत्र प्राप्त करुन घ्यावे. तसेच उपरोक्त परिशिष्ठातील तलाठी यांचे महाराष्ट्र दुय्यम सेवा विभागीय परीक्षा (एस.एस.डी.) उत्तीर्णबाबत उपलब्ध झालेल्या कागदपत्रांच्या आधारे सदरचे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत. तरी सदरच्या प्रमाणपत्रांची पुन्हा खातरजमा करुनच संबंधीत कर्मचाऱ्यास कार्यमुक्त करण्याची कार्यवाही करावी.

**४.** सदर शासन पत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेताक २०१८१०२६१३२२५५३३१९ असा आहे. हे शासन पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

आपला,

Santosh Haridasrao Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2018.10.26 13:29:19 +05'30'

**( डॉ. संतोष भोगले )**
सह सचिव

**प्रत,**

१) सर्व विभागीय आयुक्त, कोकण / पुणे / नाशिक / अमरावती / औरंगाबाद / नागपूर
२) निवडनस्ती (ई-१०).